राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण महसूली विभाग या कार्यालयातील वित्तीय बाबींकरिता "विभाग प्रमुख" घोषित करणे ...

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक.आरटीएस-२०२१/प्र.क्र.४०/लो.दि.कक्ष**
मंत्रालय, विस्तार इमारत, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १७ डिसेंबर, २०२१.

वाचा :- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५.
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.आरटीएस-२०१७/प्र.क्र.५३/१८ (र. व का.), दि.२० मार्च, २०१७.
३) महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, कोकण महसूली विभाग यांचे पत्र क्र.संकीर्ण-२०२१/ प्र.क्र.१६/रासेहआ/कोवि, दि.२६ ऑक्टोबर, २०२१.
४) राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.७२/मुसेहआ, दि.०६ नोव्हेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ च्या कलम १३ मधील तरतूदीनुसार दि.३० जुलै, २०१६ रोजीच्या अधिसूचनेन्वये "महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग" घटीत करण्यात आलेला आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन दि.२० मार्च, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक मधील अनुक्रमांक-१, नियम क्रमांक २ अनुसार मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत नियमाखाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांनुसार राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयातील उप सचिव यांना महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगाचे "विभागप्रमुख" म्हणून घोषित करण्यात आलेले आहे.

राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण महसूली विभाग हे कार्यालय नियमितरित्या कार्यान्वित होण्यासाठी, सह सचिव, राज्य सेवा हक्क आयोग, कोकण महसूली विभाग यांना सदर कार्यालयाचे विभागप्रमुख घोषित करण्याबाबत मुख्य आयुक्त यांच्या निर्देशानुसार संदर्भाधिन दि.२६ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये विनंती केली आहे. त्यास राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयाने संदर्भाधिन दि.६ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये सहमती दर्शविली आहे. त्याअनुषंगाने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभाग संदर्भाधिन शासन निर्णय दि.१७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टामधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उप विभाग-एक मधील अनुक्रमांक-१, नियम क्रमांक २ अनुसार मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत नियमाखाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांनुसार राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण विभाग कार्यालयातील **उप सचिव / सह सचिव (उप सचिव हे पद भविष्यात सह सचिव पदात श्रेणी उन्नत झाल्यास)** यांना राज्य सेवा हक्क आयोग, कोकण महसूली विभाग कार्यालयाचे "विभागप्रमुख" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगाच्या राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण महसूल विभाग या कार्यालयाव्यतिरिक्त, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालय व राज्य सेवा हक्क आयुक्त, नाशिक/ पुणे/ नागपूर/अमरावती/औरंगाबाद येथील कार्यालयांसाठी दि.२० मार्च, २०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार उप सचिव राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालय हे पुढील आदेश होईपर्यंत विभागप्रमुख राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२११२२०१६००१६०००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Indra Mallo

Digitally signed by Indra Mallo
DN: c=IN, o=Personal,
2.5.4.20=92b852624baa852a6d07acef786c78e703b2b21895
8e8c193232b28a89b9cf9a, postalCode=400021,
st=Maharashtra,
serialNumber=ecae14ed1e3640fe493f5246d6381f68a38e035
89870d467c9bac54f641fcf32, cn=Indra Mallo
Date: 2021.12.22 12:39:31 +05'30'

**( इंद्रा मालो )**
**सचिव (प्र.सु. व र. व का.)**

**प्रत:-**

१. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. राज्य सेवा हक्क आयुक्त, नाशिक/नागपूर/पुणे/अमरावती/औरंगाबाद ( राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयामार्फत)
३. सर्व विभागीय आयुक्त (महसूल), महाराष्ट्र राज्य.
४. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
७. सह सचिव, राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण महसूली विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
८. उप सचिव, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
९. उप सचिव / अवर सचिव, कार्यासन-२६, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. कक्ष अधिकारी, कार्यासन अर्थ-१/व्यय-४/विनियम, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (लो.दि.कक्ष )